**सर्वसमावेशक पिक विमा योजने अंतर्गत, खरीप हंगाम २०२४ करिता उर्वरीत शेतकरी हिस्सा विमा हप्ता अनुदानासाठी रु.१३,४१,६५,६७६/- वितरीत करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
शासन निर्णय क्रमांकः पूरक-२०२४/प्र.क्र.२८७/११-अे,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २७ मार्च, २०२५

**वाचा :-**

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. प्रपिवियो-२०२३/प्र.क्र.३४/११-अे, दि.२३.६.२०२३
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. प्रपिवियो-२०२३/प्र.क्र.५२/११-अे, दि.२६.६.२०२३
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३ दि. २५.७.२०२४
४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. प्रपिवियो-२०२४/प्र.क्र.१४९/११-अे, दि.३०.९.२०२४
५) विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी यांचे पत्र क्र.AIC.MRO/PMFBY/KH-२४/१३४८/२५, दि.२४.१.२०२५
६) संचालक(कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.कृआ/प्रपिवियो/सां.८/मागणी/१३२८/२०२५, दि.२०.१.२०२५

**प्रस्तावना :-**

राज्यात "सर्वसमावेशक पिक विमा योजना" राबविण्यास संदर्भ क्र.(१) अन्वये मान्यता देण्यात आली असून प्रधानमंत्री पिक विमा योजना, खरीप हंगाम २०२३ ते रब्बी हंगाम २०२५-२६ हंगामासाठी भारतीय कृषि विमा कंपनी, आयसीआयसीआय लोंबार्ड जनरल इन्शुरन्स कं.लि., एचडीएफसी इर्गो जनरल इन्शुरन्स कंपनी लि., ओरिएन्टल इन्शुरन्स कं.लि., युनायटेड इंडिया जनरल इन्शुरन्स कं. लि., युनिवर्सल सोम्पो जनरल इन्शुरन्स कं. लि., चोलामंडलम एम एस जनरल इन्शुरन्स कं. लि., रिलायन्स जनरल इन्शुरन्स कं. लि, एस. बी. आय. जनरल इन्शुरन्स कं.लि. या ९ विमा कंपनींमार्फत संदर्भ क्र.(२) येथील शासन निर्णयान्वये राबविण्यात येत आहे. भारतीय कृषि विमा कंपनी ही राज्यात विमा कंपन्यांची समन्वयक कंपनी आहे.

खरीप हंगाम २०२४ मधील एकूण राज्य शासनाच्या वाटयाचा शेतकरी हिस्सा (रु.१/- वगळता) रक्कम रु.१५१४.९१ कोटी पैकी संदर्भ क्र.(४) येथील शासन निर्णयान्वये, रक्कम रु.१४३६.१७ कोटी इतकी भारतीय कृषि विमा कंपनी लि. यांचे मार्फत संबंधित विमा कंपन्यांना अदा केली असून, उर्वरीत रक्कम रु.७८.७४ कोटी वितरीत करणे प्रलंबित होते. आता संदर्भ क्र.(५) च्या पत्रान्वये, भारतीय कृषि विमा कंपनीने, खरीप २०२४ मधील उर्वरीत शेतकरी हिस्सा विमा हत्यापोटी, रक्कम रु.२१.७६ कोटी इतक्या शेतकरी हिस्सा विमा हप्ता अनुदानाची मागणी केली आहे. तद्नुषंगाने, संचालक(कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी संदर्भ क्र.(६) येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुसरुन, खरीप

२०२४ मधील उर्वरीत शेतकरी हिस्सा विमा हप्ता अनुदानाकरीता रक्कम रु.१३,४१,६५,६७६/- इतका निधी योजनेची अंमलबजावणी करणा-या विमा कंपन्यांस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

भारतीय कृषि विमा कंपनीने सादर केलेली मागणी आणि तद्नुषंगाने कृषि आयुक्तालयाची विनंती यांचा विचार करता, सर्वसमावेशक पिक विमा योजना, खरीप हंगाम २०२४ करिता, उर्वरीत शेतकरी हिस्सा विमा हप्ता अनुदानासाठी आवश्यक असणारा रक्कम रु.१३,४१,६५,६७६/- इतका निधी, भारतीय कृषि विमा कंपनीमार्फत योजनेची अंमलबजावणी करणा-या विमा कंपन्यांना खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

**खरीप हंगाम २०२४**

| विमा कंपनी | विमा कंपनीच्या देयकानुसार एकूण देय शेतकरी हिस्सा विमा हप्ता रक्कम (रु) | विमा कंपन्यांना वितरीत शेतकरी हिस्सा अनुदान (रु.) | विमा कंपनीच्या देयकानुसार उर्वरीत देय शेतकरी हिस्सा रक्कम (रु.) | विमा कंपनीने केलेल्या मागणीनुसार आयुक्त कार्यालयाने शिफारस केलेली उर्वरीत प्रलंबित देय शेतकरी हिस्सा रक्कम (रु.) | वितरणासाठी प्रस्तावित उर्वरीत देय शेतकरी हिस्सा रक्कम (रु.) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४(२-३) | ५ | ६ |
| चोलामंडलम एम.एस. | १०६५७९८५४७ | १०३१४१३८३२ | ३४३८४७१५ | ३४३८४७१५ | २१२०१५७५ |
| आयसीआयसीआय लोंबार्ड | १५६६३०९९२० | १४१०३४८३५८ | १५५९६१५६२ | १५५९६१५६२ | ९६१६५७१५ |
| रिलायन्स ज. इं. कं. लि. | १६५३८०२९८७ | १६२६५५९३६३ | २७२४३६२४ | २७२४३६२४ | १६७९८३८६ |
| **एकुण** | **४२८५९११४५४** | **४०६८३२१५५३** | **२१७५८९९०१** | **२१७५८९९०१** | **१३४१६५६७६** |

२. सदरची रक्कम खरीप हंगाम २०२४ करिता, वितरीत करण्यात येत असून त्याचा वापर यापूर्वीच्या इतर हंगामाकरीता अनुज्ञेय असणार नाही.

३. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा :-

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११०, पीक विमा (००) (०८) प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत विमा हप्त्यासाठी अर्थसहाय्य**
**राज्य हिस्सा (२४०१ A ६६४) योजनेतर, ३३- अर्थसहाय्य.**

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी प्रधानमंत्री पिक विमा योजनेच्या मार्गदर्शक सूचनां व शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णयांनुसारच खर्च करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

५. उपरोक्त प्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त (कृषि) शासनास सादर करतील.

६. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहायक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. प्रस्तुत शासन निर्णय, वित्त विभाग अनौप. संदर्भ क्र.७८/२०२५/व्यय-१, दि.१९.३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक क्र. २०२५०३२७१९०२०७७४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UMESH NARAYAN CHANDIWADE

Digitally signed by UMESH NARAYAN CHANDIWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=CCBE80FCC6B64503B4E8B1269BD88D631F3F3C2BEF6E1CA70CC9A4E30954011F, cn=UMESH NARAYAN CHANDIWADE
Date: 2025.03.27 19:03:12 +05'30'

**( उमेश चांदिवडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
२. मा. राज्यमंत्री(कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
८. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०.महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
११.वित्त विभाग (व्यय-१/ अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई- ३२
१२.उप सचिव (११-अे /२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१३.कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१४.विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, लोक चेंबर्स, मरोल मरोशी नाका, मरोल. अंधेरी(पूर्व), मुंबई - ४०० ०५९.
१५.विभागीय व्यवस्थापक, आयसीआयसीआय लोंबार्ड जनरल इन्शुरन्स कं.लि., आयसीआयसीआय हाऊस, ४१४, वीर सावरकर मार्ग, सिध्दीविनायक मंदिराजवळ, प्रभादेवी, मुंबई- ४०० ०२५.
१६.विभागीय व्यवस्थापक, एचडीएफसी इर्गो इन्शुरन्स कं. लि. डी-१०३ तीसरा मजला ईटन बिझनेस, डिस्ट्रीक्ट एल.एस.बी. मार्ग भांडूप (पश्चिम), मुंबई- ४०००७८
१७.विभागीय व्यवस्थापक, ओरिएन्टल इन्शुरन्स कं.लि. पुणे.
१८. विभागीय व्यवस्थापक, युनायटेड इंडिया इन्शुरन्स कंपनी लिमिटेड, ३ रा मजला, काकडे ब्रिझ आयकोन युनिट क्र.२०२ ते २०७, गणेशखिंड मार्ग, शिवाजीनगर, पुणे ४११ ०१६.
१९.विभागीय व्यवस्थापक, युनिवर्सल सोम्पो जनरल इन्शुरन्स कं. लि. मुंबई
२०.विभागीय व्यवस्थापक, चोलामंडलम एम एस जनरल इन्शुरन्स कं. लि., पुणे
२१.विभागीय व्यवस्थापक, रिलायन्स जनरल इन्शुरन्स कं. लि, मुंबई
२२.विभागीय व्यवस्थापक, एस बी आय जनरल इन्शुरन्स कं.लि. पुणे
२३.निवड नस्ती (कार्यासन ११-अे).